राज्यातील कौशल्य विकास कार्यक्रमाच्या अंमलबजाणीकरीता उच्च व तंत्र शिक्षण विभागाशी संबंधित संचालनालय / संस्थांना कुशल प्रशिक्षित मनुष्यबळाचे उद्दिष्ट ठरविण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

शासन निर्णय क्र.कौविका-२०१०/(१८४/२०१०)/व्यशि-५

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ३० नोव्हेंबर, २०१०.

पहा : १. शासन निर्णय क्र.कौविका-२०१०/(३/२०१०)/व्यशि-५, दिनांक १९ मे, २०१०.
२. मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली कार्यकारी समितीची दिनांक ६ सप्टेंबर, २०१० रोजी झालेली बैठक.
३. संचालक (प्रशिक्षण); व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई-१ यांचे पत्र क्र.१८/एम ई एस /२०१०/०३, दिनांक २९/१०/२०१०

**प्रस्तावना-** मा.पंतप्रधानाच्या अध्यक्षतेखाली राष्ट्रीय स्तरावरील कौशल्य विकाससंदर्भातील धोरण निश्चित करण्यासाठी राष्ट्रीय कौशल्य विकास परिषदेची (Prime Minister's National Council on Skill Development) स्थापना करण्यांत आली आहे. सदरहू कौशल्य विकास परिषदेने ५०० दशलक्ष कुशल मनुष्यबळाची निर्मिती सन २०२२ पर्यंत करण्याचे उद्दिष्ट ठेवले आहे. याअनुषंगाने राज्यस्तरावर ४.५ कोटी एवढे प्रशिक्षित मनुष्यबळ तयार करण्याचे वार्षिक उद्दिष्ट ठरविण्यांत आलेले आहे.

२. संदर्भाधीन शासन निर्णयान्वये राज्य कौशल्य विकास कार्यक्रमांतर्गत मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखाली शिखर परिषद तसेच मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली कार्यकारी समितीची स्थापना करण्यांत आली आहे. मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ६/९/२०१० रोजी पार पडलेल्या कार्यकारी समितीच्या पहिल्या बैठकीमध्ये राज्यस्तरावर ठरविण्यांत आलेले ४.५ कोटी प्रशिक्षित कुशल मनुष्यबळाचे उद्दिष्ट पूर्ण करणेबाबत चर्चा झाली. त्यानुसार ४.५ कोटी एवढया मनुष्यबळाचे उद्दिष्ट उच्च व तंत्र शिक्षण, कृषि, उद्योग, लघु उद्योग, सार्वजनिक आरोग्य, शालेय शिक्षण, महिला व बाल कल्याण, अल्पसंख्यांक, इत्यादी शासकीय विभागांमध्ये विभागून देण्याचे निर्देश देण्यांत आले.

३. उपरोक्त परिस्थितीच्या अनुषंगाने २०१०-११ या चालू आर्थिक वर्षाकरीता कुशल मनुष्यबळाचे उद्दिष्ट उच्च व तंत्र शिक्षण विभागाशी संबंधित संचालनालय / संस्थामध्ये विभागून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-** कौशल्य विकास कार्यक्रमाची राज्यामध्ये प्रभावीपणे अंमलबजावणी होणेसाठी उच्च व तंत्र शिक्षण विभागाशी संबंधित विविध संचालनालयांना / संस्थांना प्रशिक्षित मनुष्यबळाचे उद्दिष्ट एम.ई.एस. कार्यक्रमांतर्गत खालीलप्रमाणे ठरवून देण्यांत येत आहे.

| अ. क्र. | संचालनालय / संस्थांचे नांव | संस्था / अभ्यासक्रम | लक्ष्य प्रतीवर्षी (लाखात) |
|---|---|---|---|
| १ | उच्च शिक्षण संचालनालय | कला, विज्ञान वाणिज्य, प्रौढ शिक्षण विद्यापीठ, इत्यादी | ३.०० |
| २ | उच्च शिक्षण संचालनालय | यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ यांची प्रशिक्षण केंद्रे | १.०० |
| ३ | तंत्र शिक्षण संचालनालय | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, तंत्र निकेतन, HMCT | १.५० |
| ४ | महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ | अशासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, तंत्र निकेतन, HMCT | ०.५० |
| ५ | व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय (व्यवसाय शिक्षण) | पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम, द्विलक्षी अभ्यासक्रम, किमान कौशल्य व्यवसाय अभ्यासक्रम (MCVC) | ३.०० |
| ६ | महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परिक्षा मंडळ | अल्प कालावधीचे प्रमाणपत्र अभ्यासक्रम | ३.६५ |
| ७ | व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय (प्रशिक्षण) | औद्योगिक प्रशिक्षण संस्था | १.४० |
| | **एकूण** | | **१४.०५** |

वरील उद्दिष्टपूर्ती गाठण्याकरीता आवश्यक ती सर्व कार्यवाही संबंधितांनी हाती घ्यावी. विहित कालावधीत उद्दिष्टपूर्तीची जबाबदारी संबंधित संचालक / प्र.संचालक तसेच संबंधित संस्थांची राहील. उपरोक्तप्रमाणे वरील सर्व संचालनालय / संस्थांचे समन्वय करण्याची जबाबदारी संचालक (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची राहील. संचालक (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी वरील सर्व संचालनालय / संस्थानी केलेल्या कार्यवाहीचा त्रैमासिक एकत्रित अहवाल शासनास सादर करावा.

२. हा शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर www.maharashtra.gov.in यावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय सांकेतांक क्र. २०१०११०६१४००३७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(उ. वै. जोशी)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा.मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव

मा.सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, कोकण भवन, नवी मुंबई
सर्व सह सचिव / उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सहसंचालक/उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई / पुणे / नागपूर / अमरावती / औरंगाबाद / नाशिक [संचालक (प्रशिक्षण) यांचेमार्फत]
संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण परिक्षा मंडळ, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परिक्षा मंडळ, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
कुलगुरु, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक [संचालक, उच्च शिक्षण यांचेमार्फत]
महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
कार्यासन अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अधिकारी, व्यशि-१,२,३,४,
निवड नस्ती/व्यशि-५.